महाराष्ट्र माहिती व संदर्भ केंद्र (Maharashtra Information & Reference Centre) स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक माजम-२०११/प्र.क्र.९५/का.३४.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०९ मार्च, २०११

संदर्भः- १) संचालक, (माहिती/प्रशासन ) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र म.कें.ग्र. /का-५/२०११/१२७, दि. ०८.०३.२०११.

**प्रस्तावनाः-**

मा.मुख्यमंत्री, मा.उपमुख्यमंत्री, मा.मंत्री, मा. राज्यमंत्री तसेच शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना दैनंदिन कामकाजासाठी माहितीच्या संदर्भांची सतत आवश्यकता भासत असते. मात्र मंत्रालयातील ग्रंथालयाची या अनुषंगाने फारशी मदत होत नाही. आर्थिक, कृषी, शिक्षण, आरोग्य, सामाजिक प्रश्न, सहकार उद्योग, सिंचन, माहिती तंत्रज्ञान, पत्रकारिता, प्रशासन, नियोजन, ग्रामविकास, नगरविकास, आदिवासी याबाबतची माहिती असणारे राज्य शासनाचे अद्ययावत केंद्र असणे आवश्यक आहे. याबाबतची माहिती आधुनिक तंत्रज्ञानाच्या आधारे विषयवार एकत्रित करून आवश्यकतेनुसार उपलब्ध होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने मंत्रालयात **महाराष्ट्र माहिती व संदर्भ केंद्र (Maharashtra Information & Reference Centre)** स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालील निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णयः-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयांतर्गत **"महाराष्ट्र माहिती व संदर्भ केंद्र (Maharashtra Information & Reference Centre)"** स्थापन करण्याच्या रू.९५,००,०००/- (रूपये पंचान्नव लाख फक्त) योजनेस शासनाची या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तावित खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | बाब | अनावर्ती खर्च (रूपये) |
|---|---|---|
| १ | मंत्रालय ग्रंथालयात पोटमाळा तयार करणे | २०,००,००० |
| २ | ५ संगणक खरेदी करणे | २,००,००० |
| ३ | मध्यवर्ती वातानुकुलीत यंत्रणा बसविणे | ४०,००,००० |
| ४ | २ स्कॅनर मशीन खरेदी करणे | ८०,००० |
| ५ | १ झेरॉक्स मशीन खरेदी करणे | १,००,००० |
| ६ | फर्निचर | २५,००,००० |
| ७ | लोखंडी कपाटे | १,२०,००० |
| ८ | सॉफ्टवेअर | ५,००,००० |
|  | एकूण | ९५,००,००० |

या केंद्राचे कामकाज माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या सध्याच्या उपलब्ध अधिकारी/कर्मचारी यांच्याकडुन हाताळण्यात येईल. त्यासाठी अतिरिक्त कर्मचारीवर्ग मंजूर केला जाणार नाही.

२. सदर बाबीवरील खर्च मागणी क्र. ए-६ - २२२०, माहिती व प्रसिध्दी, १०९ छायाचित्र सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(०१) छायाचित्र सेवा (२२२००४१९) या शीर्षाखाली वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातुन देण्यात येणाऱ्या मंजूरीच्या आदेशानंतर भागविण्यात यावा.

२. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, नियम क्र.२७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०९११९२७२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(आ. म. लुडबे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई-३२,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (१/२) मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा (१/२) मुंबई / नागपूर,
संचालक (माहिती) (प्रशासन ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षाअधिकारी, मुंबई,
नियोजन विभाग,
**निवड नस्ती** (का.३४).